## ॥ श्री साईबाबा सकलमनोरथसिद्ध यंत्र ॥




## साई धून

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥
हरे साई हरे साई साई साई हरे हरे ।
हरे बाबा हरे बाबा बाबा बाबा हरे हरे ॥
हरे दत्त हरे दत्त दत्त दत्त हरे हरे ।
हरे साई हरे साई साई साई हरे हरे ॥
साई राम साई राम साई राम साई राम ।
साई श्याम साई श्याम साई श्याम साई श्याम ॥

शिरडीचे श्रीसाईबाबा यांचे सर्वकामना पूर्ण करणारे,
आयुरारोग्य, सुख-शांती-समृद्धी देणारे व्रत

# शिरडीच्या साईबाबांचे व्रत






॥ ॐ साईनाथाय नमः॥

## "नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत"

### मनोगत

आपल्या पवित्र वास्तव्याने श्रीक्षेत्र शिरडीला नावारुपास आणणारे साईबाबा हे भारतातील सनातन सिद्ध परंपरेतील एक महान सिद्धपुरुष होते. अवलिया ज्ञानी संत होते. त्यांनी लोकांना प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय साधून आपले जीवन आनंदाने कसे जगावे ते शिकवले. त्यांचे सहज बोलणेही बोधप्रद असे. ते आपल्या भक्तांना नेहमी म्हणत असत-"बाबांनो! देव भावाचा भुकेला आहे. सर्वत्र अंतर्बाह्य व्यापून आहे. त्याला प्रत्येक वस्तुमात्रात पहा. शुद्ध अंतःकरणाने त्याला भजा. तो भक्तीनेच आपलासा होतो. **एक भगवंतच सर्वांचा मालक आहे.** त्याचे सर्वांवर लक्ष असते. तोच तारणारा आहे. तोच सांभाळणारा आहे. त्याच्यावर **श्रद्धा** ठेवा, **सबुरी** बाळगा, म्हणजे तुम्हाला त्याच्या कृपेची प्रचिती येईल."

साईबाबांचे जीवनचरित्र हे त्यांच्या कार्यांचा, त्यांच्या अनुभवसंपन्न मार्गदर्शक विचारांचा अमूल्य ठेवा आहे. त्यांच्या भक्तीने अंतःकरण शुद्ध होते; चित्त स्थिर व निर्मळ होते. जीवनात समाधान व आनंद निर्माण होतो. साईबाबा भक्तवत्सल व भक्ताभिमानी आहेत. ते अल्पसेवेनेही संतुष्ट होतात. ते आपल्या भक्तांची अहोरात्र काळजी घेतात. त्यांची दुःखे, संकटे घालवितात. त्यांचे रक्षण करतात. त्यांचे मनोरथ पूर्ण करून त्यांचे इहपरत्र कल्याण करतात. आजपर्यंत असंख्य भाविकांनी श्रीसाईंना शरण जाऊन त्यांच्या कृपेचा प्रसाद प्राप्त केला आहे. तो कृपारूपी प्रसाद आपल्यालाही प्राप्त व्हावा म्हणून **'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत'** हे पुस्तक लिहिले आहे. या व्रताने बाबांची कृपा होऊन आपले सर्व मनोरथ पूर्ण होवोत ही सदिच्छा. समर्थ सद्गुरु श्रीसाईनाथ महाराज की जय !

- जितेन्द्रनाथ ठाकुर







## व्रतमाहात्म्य

**'नऊ गुरुवारचे शिरडीच्या साईबाबांचे व्रत'** हे श्रीसाईबाबांप्रीत्यर्थ केले जाणारे एक महाफलदायी श्रेष्ठ व्रत आहे. मनुष्याला नित्याच्या जीवनात अनेक संकटांना, अडचणींना व पेचप्रसंगांना सामोरे जावे लागते. त्यामुळे मानसिक व शारीरिक अस्वास्थ्य, चिंता, क्लेश, उद्वेग अशा अनेक गोष्टी उद्भवतात. मनःशांती हरपते. या व्रताचरणाने श्रीसाईबाबांची प्रसन्नता लाभून त्या सर्वांचे निवारण होते. यश, कीर्ती, सुख, शांती, समाधान, ऐश्वर्य व आयुरारोग्य लाभते. कष्ट प्रसंगांना तोंड देण्याचे सामर्थ्य (धैर्य) प्राप्त होते. श्रद्धा वृद्धींगत होते. साईभक्तीची हीच किमया आहे.

शत्रुभय नाहीसे व्हावे, विद्याभ्यासात प्रगती व्हावी, नोकरी मिळावी, लग्न व्हावे, धंदा व्यवसायात गती मिळावी, संकटाचे निवारण व्हावे, सर्व प्रकारची समृद्धी यावी, प्रगती व्हावी, उत्तम संतती लाभावी अशा अनेक इष्टकार्यसिद्धींसाठी हे व्रत केले जाते. संकटसमयी श्रीसाईबाबांना आर्त हाक मारून या व्रताचा संकल्प केल्यावर त्या संकटातून सुखरुप सुटका झाल्याची अनेक उदाहरणे आहेत. मात्र संकल्प केल्याप्रमाणे या व्रताचे आचरणही केले पाहिजे. या व्रताने अनेकांना चमत्कारिक अनुभव आलेले आहेत. या व्रताचरणाने आपलेही कल्याण होईल अशी निष्ठा ठेवा.

**या व्रताविषयी काही सूचना :**

१) शिरडीचे साईबाबा हे भक्तवत्सल व भक्ताभिमानी आहेत. त्यांच्या समाधिस्थानी त्यांची चिरंतन आत्मज्योत आजही जागृत आहे. ते भाविकांना आजही दर्शन देतात. त्यांना मार्गदर्शन करतात. म्हणूनच व्रतकर्त्याने साईबाबा साक्षात भगवंतच आहेत असा दृढविश्वास ठेवूनच हे व्रत करावे.

२) हे व्रत दिनशुद्धी पाहून कोणत्याही गुरुवारपासून आरंभ करावे.

३) हे व्रत क्रमाने नऊ गुरुवार करावयाचे आहे.

४) हे व्रत बारावर्षांवरील कोणतीही व्यक्ती आबालवृद्ध, स्त्री-पुरुष, पति-पत्नी व कोणत्याही जाती धर्माची व्यक्ती सद्भावनेने करू शकते.

५) दुसऱ्यांच्या कार्यात अडथळे निर्माण व्हावेत, दुसऱ्यांचे अहित व्हावे असा कोणताही दुष्ट हेतू धरून हे व्रत करू नये. संकल्प शुद्ध व कल्याणकारी असावा.

६) व्रतकर्त्याने या दिवशी उपवास करावा. तो सायंकाळी सोडावा. फलाहार, चहा, कॉफी घेऊ शकता.

७) इतर व्रतांप्रमाणे या व्रतातही व्रतदिनी परनिंदा करणे, खोटे बोलणे, अपशब्द बोलणे, भांडण-तंटा करणे, हिंसा करणे, अधमनि वागणे वर्ज्य आहे. ब्रह्मचर्य पाळावे. व्यसन करू नये.

८) 'व्रतसंकल्प' फक्त पहिल्याच गुरुवारी करावयाचा आहे.

९) संकल्पित व्रत झाल्यावर दहाव्या गुरुवारी उद्यापन करावे.

१०) स्त्रियांच्या बाबतीत व्रताचरण करताना मासिक अडचण आल्यास फक्त उपवास करावा. तो गुरुवार गृहीत धरू नये. जेवढे गुरुवार आड येतील तेवढे गुरुवार अधिक करून नऊ ही संख्या पूर्ण करावी. उद्यापन त्यानंतरच्या गुरुवारी करावे.

११) शहरांतील घरांमध्ये देवांसाठी स्वतंत्र खोली नसते. तसेच मासिक





अडचणींच्या काळात शिवाशिवही पाळली जात नाही. अशावेळी घरातील स्त्रीला अडचण आल्यास पुरुष व्रतकर्त्यानेही तो गुरुवार गृहीत धरू नये. उपवास करावा व एक गुरुवार अधिक करून नऊ ही संख्या पूर्ण करावी. व्रतोद्यापन त्यानंतरच्या गुरुवारी करावे.

१२) प्रवासाचा प्रसंग आला तरी उपवास सोडू नये. अशावेळी श्रीसाईबाबांची यथासांग पूजा, आरती व नैवेद्य या गोष्टी शक्य होणार नाहीत. तेव्हा साईबाबांची मानसपूजा करावी. पण तो गुरुवार गृहीत धरू नये. एक गुरुवार अधिक करावा.

१३) हे शीघ्रफलदायी व्रत आहे. ज्या इष्टकार्यसिद्धीसाठी आपण हे व्रत आचरणार असाल ते इष्टकार्य श्रीसाईंच्या कृपेने नऊ गुरुवारच्या आतच संपन्न झाले तरी व्रतोपासना चालू ठेवावी व दहाव्या गुरुवारी यथाविधी उद्यापनही करावे. इच्छित कार्य पूर्ण झाले म्हणून व्रत मध्येच सोडू नये.

१४) जे नित्य गुरुवारचे उपवास करतात त्यांनी नऊ गुरुवारांबद्दल इष्ट कामनेचा उच्चार करून सकाम उपासना म्हणून त्या उपवासांचा विनियोग करावा. दहाव्या गुरुवारी उद्यापन करून नेहमीचे गुरुवारचे उपवास चालू ठेवावे.

१५) **विशेष सूचना-** काही कारणांमुळे उदा. सुतक, सोहेर, घरावर अचानक आलेले संकट, स्वत:चे आजारपण, प्रवास, महापुरासारखी सार्वजनिक आपत्ती, व्रतकर्त्या स्त्रीच्या बाबतीत तिच्या मुलाचा आजार व तिच्या स्वत:च्या बाळंतपणानंतरचे तीन महिने इत्यादी अनेक कारणांनी व्रतामध्ये खंड पडू शकतो. अशावेळी तेवढे गुरुवार मोजू नयेत. उपवास करू नयेत. अशा प्रसंगी जेवढे गुरुवार झालेले असतील त्यांचे पुण्य फुकट जात नाही. परिस्थिती अनुकूल होताच उरलेले गुरुवार करून यथाविधी उद्यापन करावे.

१६) व्रतदिनी एकादशी, महाशिवरात्र यासारखा पूर्ण उपवासाचा दिवस आल्यास त्या गुरुवारी फक्त उपवास करावा. तो गुरुवार गृहीत धरू नये. एक गुरुवार अधिक करून त्यानंतर उद्यापन करावे.



ॐ साई राम

व्रताविषयी काही सूचना :

शिरडीचे साईबाबा हे भक्तवत्सल व भक्ताभिमानी आहेत. त्यांच्या समाधिस्थानी त्यांची चिरंतन आत्मज्योत आजही जागृत आहे. ते भाविकांना आजही दर्शन देतात. त्यांना मार्गदर्शन करतात. म्हणूनच व्रतकर्त्याने साईबाबा साक्षात भगवंतच आहेत असा दृढविश्वास ठेवूनच हे व्रत करावे.

हे व्रत दिनशुद्धी पाहून कोणत्याही गुरुवारपासून आरंभ करावे.

हे व्रत क्रमाने नऊ गुरुवार करावयाचे आहे.

हे व्रत बारावर्षांवरील कोणतीही व्यक्ती आबालवृद्ध, स्त्री-पुरुष, पति-पत्नी व कोणत्याही जाती धर्माची व्यक्ती सद्भावनेने करू शकते.

दुसऱ्यांच्या कार्यात अडथळे निर्माण व्हावेत, दुसऱ्यांचे अहित व्हावे असा कोणताही दुष्ट हेतू धरून हे व्रत करू नये. संकल्प शुद्ध व कल्याणकारी असावा.

व्रतकर्त्याने या दिवशी उपवास करावा. तो सायंकाळी सोडावा. फलाहार, चहा, कॉफी घेऊ शकता.

इतर व्रतांप्रमाणे या व्रतातही व्रतदिनी परनिंदा करणे, खोटे बोलणे, अपशब्द बोलणे, भांडण-तंटा करणे, हिंसा करणे, अधमनि वागणे वर्ज्य आहे. ब्रह्मचर्य पाळावे. व्यसन करू नये.

'व्रतसंकल्प' फक्त पहिल्याच गुरुवारी करावयाचा आहे.

संकल्पित व्रत झाल्यावर दहाव्या गुरुवारी उद्यापन करावे.

०) स्त्रियांच्या बाबतीत व्रताचरण करताना मासिक अडचण आल्यास फक्त उपवास करावा. तो गुरुवार गृहीत धरू नये. जेवढे गुरुवार आड येतील तेवढे गुरुवार अधिक करून नऊ ही संख्या पूर्ण करावी. उद्यापन त्यानंतरच्या गुरुवारी करावे.

१) शहरांतील घरांमध्ये देवांसाठी स्वतंत्र खोली नसते. तसेच मासिक

ॐ साई राम

अडचणींच्या काळात शिवाशिवही पाळली जात नाही. अशावे घरातील स्त्रीला अडचण आल्यास पुरुष व्रतकर्त्यानेही तो गुरुवार गृही धरू नये. उपवास करावा व एक गुरुवार अधिक करून नऊ ही संख पूर्ण करावी. व्रतोद्यापन त्यानंतरच्या गुरुवारी करावे.

१२) प्रवासाचा प्रसंग आला तरी उपवास सोडू नये. अशावेळी श्रीसाईबाबां यथासांग पूजा, आरती व नैवेद्य या गोष्टी शक्य होणार नाहीत. ते साईबाबांची मानसपूजा करावी. पण तो गुरुवार गृहीत धरू नये. ए गुरुवार अधिक करावा.

१३) हे शीघ्रफलदायी व्रत आहे. ज्या इष्टकार्यसिद्धीसाठी आपण हे व्रत आचरण असाल ते इष्टकार्य श्रीसाईंच्या कृपेने नऊ गुरुवारच्या आतच संपन्न झाले त व्रतोपासना चालू ठेवावी व दहाव्या गुरुवारी यथाविधी उद्यापनही करा इच्छित कार्य पूर्ण झाले म्हणून व्रत मध्येच सोडू नये.

१४) जे नित्य गुरुवारचे उपवास करतात त्यांनी नऊ गुरुवारांबद्दल इष्ट कामने उच्चार करून सकाम उपासना म्हणून त्या उपवासांचा विनियोग करा दहाव्या गुरुवारी उद्यापन करून नेहमीचे गुरुवारचे उपवास चालू ठेवा

१५) विशेष सूचना- काही कारणांमुळे उदा. सुतक, सोहेर, घरावर अचान आलेले संकट, स्वत:चे आजारपण, प्रवास, महापुरासारखी सार्वजनि आपत्ती, व्रतकर्त्या स्त्रीच्या बाबतीत तिच्या मुलाचा आजार व तिच स्वत:च्या बाळंतपणानंतरचे तीन महिने इत्यादी अनेक कारणांनी व्रताम खंड पडू शकतो. अशावेळी तेवढे गुरुवार मोजू नयेत. उपवास करू नये अशा प्रसंगी जेवढे गुरुवार झालेले असतील त्यांचे पुण्य फुकट जात ना परिस्थिती अनुकूल होताच उरलेले गुरुवार करून यथाविधी उद्यापन करा

१६) व्रतदिनी एकादशी, महाशिवरात्र यासारखा पूर्ण उपवासाचा दि आल्यास त्या गुरुवारी फक्त उपवास करावा. तो गुरुवार गृहीत धरू न एक गुरुवार अधिक करून त्यानंतर उद्यापन करावे.

**"नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत" याचे अद्‌भुत अनुभव आणि चमत्कार :**

'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' हे एक अत्यंत प्रभावी, आचरण्यास सुलभ, शीघ्रफलदायी आणि मंगलप्रद व्रत आहे. या व्रताच्या पुण्यप्रभावाने आणि श्रीसाईबाबांच्या पूर्ण कृपेने अनेक भक्तांचे इष्ट मनोरथ पूर्ण झाले असून अनेकांचे कल्याण झाले आहे. येथे काही भक्तांचे अनुभव देत आहोत.

**१) अभ्यासात उत्तम प्रगती झाली.**

दहाव्या इयत्तेत शिकणाऱ्या एका विद्यार्थिनीला केलेला अभ्यास लक्षात राहत नसे. त्यामुळे तिला शिक्षणात रुची राहिली नाही. घरी आई-वडील व शाळेत शिक्षक यांच्याकडून तिला अभ्यासावरून नेहमी बोलणी खावी लागत. तिचे शिक्षण हा तिच्या पालकांच्या चिंतेचाच विषय झाला होता. नववीपर्यंत ती कशीबशी वरच्या वर्गात जात होती पण दहावीचे काय? ती परीक्षा उत्तीर्ण झाल्याशिवाय पुढे कसे जाता येणार? शेवटी जे व्हायचे तेच झाले. ती मुलगी दहावीच्या दोन परीक्षा देऊनही नापासच होत राहिली. शेवटी कोणाच्यातरी सांगण्यावरून तिने 'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' केले. तर काय आश्चर्य! श्रीसाईबाबांच्या कृपेने तिची स्मरणशक्ती वाढली. केलेला अभ्यास तिच्या लक्षात राहू लागला. त्यामुळे तिचा आत्मविश्वास वाढला. तिने भरपूर अभ्यास करून १०वी बोर्डाची सर्व विषयांची परीक्षा दिली. त्यात ती सर्वोत्तम गुणांनी पास झाली. तिच्या पालकांच्या व शिक्षकांच्या दृष्टीने हा एक चमत्कारच होता. आता ती शास्त्र (सायन्स) शाखेत पदवी शिक्षण घेत आहे.

**२) नोकरी मिळाली.**

वाणिज्य शाखेच्या एका उच्च पदवीधर तरुणाला शैक्षणिक पात्रता असूनही प्रयत्न करूनही मनासारखी नोकरी मिळत नव्हती. त्यामुळे तो अक्षरशः निराश झाला होता. त्याच्या घरच्यांनाही त्याच्या नोकरीची





चिंता लागली होती. तेव्हा एका सद्‌गृहस्थाने त्यांना श्रीसाईबाबांना शरण जाऊन 'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' करावयास सांगितले. ते त्याच्या आई-वडिलांनी मनःपूर्वक आणि पूर्ण श्रद्धेने केले. उद्यापनही केले. त्यामुळे श्रीसाईबाबांच्या परम कृपेने त्यांच्या मुलाला एक चांगल्या फर्ममध्ये उत्तम पगाराची नोकरी लागली.

**३) संतानप्राप्ती झाली.**

एका दांपत्यास लग्न होऊन अनेक वर्षे झाली तरी मूलबाळ नव्हते. त्यांनी मोठमोठ्या डॉक्टरांकडून खर्चिक चाचण्या व अनेक उपाय केले. पण काहीही उपयोग झाला नाही. वैद्यकीय उपचार थकले तेव्हा नवससायासादी धार्मिक उपायही करून पाहिले. पण तेही व्यर्थच ठरले. लोकांकडून येणारे टोमणे, निपुत्रिक म्हणून समाजाचा त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन, त्यातील कुत्सित भाव त्यामुळे ती उभयता अक्षरशः निराश झाली होती. त्यांच्या जीवनातील आनंदच हरपून गेला होता. या दंपतीमधील पत्नी एका सरकारी कार्यालयात नोकरी करीत होती. एके दिवशी तिच्या एका कर्मचारी सहकाऱ्याने तिला 'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' याबद्दल सांगितले आणि साईव्रताचे एक पुस्तकही तिला आणून दिले. तिने ते मनःपूर्वक वाचले. त्यातील भक्तांचे अनुभव वाचून या व्रताचरणाने आपलीही मनोकामना पूर्ण होईल असा तिला विश्वास वाटू लागला. त्यानंतर श्रीसाईबाबांवर पूर्ण श्रद्धा ठेवून तिने ते व्रत केले. त्यामुळे साईबाबा तिच्यावरही प्रसन्न झाले. लवकरच तिला दिवस राहिले. प्रसुतिकाल पूर्ण होताच तिने एका कन्येला जन्म दिला. अशाप्रकारे साईकृपेने तिचे मनोरथ पूर्ण झाले. आज ते दांपत्य त्या मुलीचे कोडकौतुक करीत सुखाने कालक्रमणा करीत आहे.

**४) प्राणसंकटातून सुटका झाली.**

एका गृहस्थाच्या पत्नीला बद्धकोष्ठाचा विकार होता. तिला शौचाला त्रास





होत असे. त्यावर उपाय म्हणून ती एक आयुर्वेदिक चूर्ण कोमट पाण्याबरोबर नेहमी घेत असे. एके दिवशी ते चूर्ण घेत असताना कोमट पाणी भरलेल्या काचेच्या ग्लासाची काच तडकली आणि त्याच काचेचा एक तुकडा पाण्याबरोबर तिच्या पोटात गेला. त्यामुळे ती खूप घाबरली. थोड्यावेळाने तिला शौच्यावाटे रक्तस्राव होऊ लागला. काही केल्या तो थांबेना. ते पाहून ते गृहस्थही घाबरले. पत्नीची अवस्था तर खूपच केविलवाणी झाली होती. आपले काही बरेवाईट तर होणार नाही या विचारांनी तिला मूर्च्छा येऊ लागली. मध्यरात्रीची वेळ. अशावेळी मदतीसाठी हाक तरी कोणाला मारणार? त्या सद्‌गृहस्थांनी 'साईबाबांच्या नऊ गुरुवारच्या व्रताविषयी' ऐकले होते. त्या संकटसमयी त्यांना साईबाबांची आठवण झाली. त्यांनी देव्हाऱ्यातील श्रीसाईंच्या तसबिरीसमोर दिवा लावला आणि श्रीसाईंची प्रार्थना करीत म्हणाले, "महाराज, माझ्यावर कृपा करा. काचेचा तुकडा पोटात गेल्यामुळे माझ्या पत्नीला रक्तस्राव होत आहे तो थांबू द्या. हे तिच्यावरील प्राणसंकटच आहे. यातून ती सुखरूप राहिली तर मी आपले नऊ गुरुवारचे व्रत विधिपूर्वक आणि श्रद्धेने करीन." तर काय आश्चर्य! थोड्या वेळातच त्यांच्या पत्नीचा रक्तस्राव थांबला आणि पोटात गेलेल्या काचेचा तुकडाही शौचावाटे बाहेर पडला. दुसऱ्या दिवशी त्यांनी आपल्या पत्नीला तज्ज्ञ डॉक्टरांकडे नेले असता त्यांनी त्यांच्या पत्नीच्या पोटात कसलीही इजा झालेली नाही असे तपासणीअंती सांगितले. ते ऐकून त्या गृहस्थांनी सुटकेचा निःश्वास टाकला. अल्पावधीत त्यांच्या पत्नीचे आरोग्यही सुधारले. याबद्दल त्या गृहस्थांनी श्रीसाईबाबांनाच धन्यवाद दिले आणि संकल्प केल्याप्रमाणे नऊ गुरुवारचे व्रत मोठ्या श्रद्धेने केले.

**५) पोटदुःखी थांबली.**

एका बाईच्या सतत पोटात दुखत असे. त्यावर त्यांनी बरेच औषधोपचार





केले. पथ्येही पाळली. त्यामुळे त्यांना तेवढ्यापुरते बरे वाटे. काही दिवसांनी व्याधी पुन्हा उद्‌भवे. शेवटी त्यांनी तज्ज्ञ डॉक्टरांचा सल्ला घेतला. त्यांनी विविध प्रकारच्या चाचण्या व तपासण्या करून त्यांच्या आतड्यात बिघाड असल्यामुळे पोटात दुखते असा निर्वाळा दिला आणि ऑपरेशन करावयास सांगितले. त्यांच्या सल्ल्यानुसार त्या बाईंनी ऑपरेशनही करून घेतले, पण उपयोग झाला नाही. काही खाल्ले, प्यायले तरी खूप त्रास व्हायचा. त्याबद्दल त्यांनी डॉक्टरांना सांगितले असता त्यांनी त्यांना आणखी एक ऑपरेशन करावे लागेल असे सांगितले. त्यामुळे त्या बाई घाबरल्या. ऑपरेशनसाठी लागणारी रक्कम कोठून आणायची हाही प्रश्न होताच. तेव्हा त्यांची चिंता जाणून एका मैत्रिणीने त्यांना **'श्रीसाईबाबांचे नऊ गुरुवारचे व्रत'** करा म्हणजे साईकृपेने तुम्हाला नक्की बरे वाटेल असे सांगितले. त्याप्रमाणे त्या बाईंनी श्रीसाईंचे ते व्रत यथाविधी मोठ्या श्रद्धेने केले. व्रतोपासनेच्या काळात उदबत्तीचे पडणारे भस्म त्या बाबांची उदी म्हणून श्रद्धेने आपल्या पोटास चोळत असत. त्यांची निष्ठा फळास आली आणि व्रत पूर्ण होण्याच्या आधीच त्यांच्या व्याधीस लक्षणीय उतार पडला. त्यामुळे त्यांना अतिशय आनंद झाला. त्यांनी ते व्रत यथासांग करून उद्यापनही केले.

अशा प्रकारे अनेक सद्‌भक्तांना शिरडीच्या श्रीसाईबाबांच्या या नऊ गुरुवारच्या व्रताचे चमत्कारीक अनुभव आलेले आहेत. या व्रताचे सद्‌भावाने आचरण केल्यामुळे अनेकांची संकटातून सुटका झाली आहे, अनेकांना आरोग्य लाभले आहे, अनेकांची अडलेली कामे मार्गी लागली आहेत, अनेकांच्या जीवनात सुख, शांती व स्थैर्य आलेले आहे. श्रीसाईबाबा हे भक्तांचे कल्याण करणारे महान कृपासिद्ध आहेत. या व्रतरूपी सेवाभक्तीने आपणही त्यांना प्रसन्न करून घ्यावे एवढेच सांगणे आहे.

**तसंकल्प-**

कोणतेही काम्यव्रत संकल्पाशिवाय करू नये असा संकेत आहे. 'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' या व्रताचा संकल्पही पहिल्या गुरुवारी फक्त एकदाच करावयाचा आहे.

या दिवशी स्नानानंतर शुद्ध वस्त्रे नेसून कपाळास गंध वा बाबांची उदी लावावी.

श्रीगणपती, कुलदेवता, ग्रामदेवता, इष्टदेवता व श्रीगुरुदेवांचे स्मरण करून घरातील वडिलधाऱ्यांना नमस्कार करावा.

त्यानंतर घरातील देवांची नित्यपूजा करावी.

पूजनानंतर देव्हाऱ्यासमोर उभे राहून सर्व देवांना नमस्कार करावा.उजव्या तळहातावर पळीभर पाणी घ्यावे आणि श्रीगणपतीचे व श्रीसाईबाबांचे स्मरण करून पुढीलप्रमाणे संकल्प म्हणावा- ''हे गणपती गजानना ! हे सद्गुरु साईनाथा ! तुम्ही भाविकांचे रक्षणकर्ते आहात, दीनांचे तारक व अनाथांचे नाथ आहात. तुम्हाला शरण आलेल्यांची तुम्ही कधीही उपेक्षा करीत नाही. म्हणूनच मी ....... (आपले नाव घ्यावे)......... आज शके एकोणीसशे ...... त, ......(मराठी महिन्याचे नाव घ्यावे) ...... मासात, .... (कृष्ण वा शुक्ल यापैकी जो असेल त्या पक्षाचे नाव घ्यावे) ...... पक्षातील ...... या तिथीस गुरुवारी ...... (येथे आपली मनोकामना सांगावी) ..... हे कार्य पूर्ण व्हावे म्हणून आपले'नऊ गुरुवारचे साईबाबांचे व्रत' करण्याचा संकल्प करीत आहे. या व्रताच्या नियमानुसार आचरण करून मी आपल्या प्रीत्यर्थ पूजन, व्रतकथावाचन व उपोषण करून यथाशक्ती आपली सेवा करणार आहे. दहाव्या गुरुवारी यथाविधी उद्यापन करून एका मुलाला आणि पाच गरीबांना भोजन घालणार आहे. हे संपूर्ण व्रताचरण आपल्या कृपेने





निर्विघ्न पार पडो. तसेच या व्रताने संतुष्ट होऊन आपण माझी मनोकामना पूर्ण करा अशी मी आपणांस नम्र विनंती करतो. श्री गणेशाय नमः। श्री साईनाथाय नमः। मम कार्यं निर्विघ्नमस्तु। असे म्हणून तळहातावरील संकल्पयुक्त जल ताम्हनात सोडावे. गणपतीला एक फूल वाहून नमस्कार करावा. साईबाबांना एक फूल वाहून नमस्कार करावा.

६) ताम्हनातील जल तुळशीस घालावे. अशाप्रकारे व्रतसंकल्प केल्यावरच पुस्तिकेत सांगितल्याप्रमाणे व्रताचरणास प्रारंभ करावा. श्रीसाईबाबांचे पूजन, अर्चन करावे.

**व्रतोपासना :**

१) व्रतकर्त्याने प्रत्येक गुरुवारी सकाळी लवकर उठावे आणि सर्वप्रथम श्रीसाईबाबाचे स्मरण करावे.

२) प्रातर्विधी झाल्यावर आंघोळ करून स्वच्छ वस्त्रे नेसावी.

३) मग श्रीगणपती, कुलदेवता, ग्रामदेवता, इष्टदेवता व गुरुदेवांचे (किंवा दत्तात्रेयांचे) स्मरण करून घरातील वडिलधाऱ्या मंडळींना नमस्कार करावा.

४) त्यानंतर पूजेची सर्व सिद्धता करून श्रीसाईबाबांच्या तसबिरीची पंचोपचार पूजा करावी. पूजन करताना मन शांत व प्रसन्न असावे. व्रतदैवत श्रीसाईबाबा आपल्या समोर साक्षात बसलेले आहेत असा भाव असावा. (टीप-या पूजेचा विधी याच पुस्तिकेत अन्यत्र दिलेला आहे. त्याप्रमाणे पूजा करावी.)

५) साईबाबांची पूजा झाल्यावर आरती करावी. त्यानंतर श्रीसाईनमनाष्टक, श्रीसाईमाहात्म्य अर्थात नऊ गुरुवारची व्रतकथा, श्रीसाईचालीसा, श्रीसाईबाबा अष्टोत्तरशत नामावली व श्रीसाईबाबांची भक्तांना अभय देणारी सुप्रसिद्ध अकरा वचने म्हणावीत. साईबाबांना दाखवलेला नैवेद्य प्रसाद म्हणून सर्वांना वाटावा.





. दुपारी १२ ते १२.३० च्या दरम्यान बाबांना त्यादिवशी घरात शिजवलेल्या पक्वान्नांचा (शाकाहारी) नैवेद्य दाखवावा. हा नैवेद्य मोठ्या ताटात एका माणसाला पुरेल इतका असावा. त्यात भात, वरण किंवा आमटी, भाजी, चपाती किंवा भाकरी, ताक किंवा गोड दही आदी पदार्थांचा समावेश असावा. शक्य असल्यास एखादा गोड पदार्थ ठेवावा. नैवेद्याच्या ताटात मीठ वाढू नये. हा नैवेद्य बाबांच्या तसबिरीसमोर पाटावर ठेवूनच दाखवावा. त्यांना पिण्यासाठी पाण्याचे भांडे ठेवावे.

महानैवेद्य व्रतकर्त्याने ग्रहण करावा असा संकेत आहे. पण या व्रतात उपवास संध्याकाळी सोडायचा असल्याने तो घरातील वडील मंडळीपैकी कोणीही खावा. तो नैवेद्य बाबांचा प्रसाद म्हणून घरातील सर्वांनी वाटून खाल्ला तरी चालेल.

सायंकाळी बाबांच्या तसबिरीसमोर अगरबत्ती व तुपाचा दिवा लावावा. (साजुक तुपाचे निरांजन लावल्यास मांगल्य निर्माण होते.) बाबांना नमस्कार करून साईचालीसा वाचावी.

व्रतकर्त्याने हा गुरुवारचा दिवस श्रीसाईबाबांच्या नामस्मरणात घालवावा. त्यांच्या उपदेशपर वचनांवर चिंतन करावे. जवळपास साईबाबांचे मंदिर असेल तर तेथे जाऊन बाबांचे दर्शन घेऊन यावे. रात्रीच्या वेळी श्रीसाईबाबांचे भजन करावे व त्यांचे स्मरण करीत झोपी जावे.

१०) श्रीसाईबाबा आपल्या सर्व भक्तांचा आदर करीत. अतिथी-अभ्यागतास प्रेमाने खाऊ घालीत. गावातून मागून आणलेले भिक्षान्न मुक्या प्राण्यांना, भुकेलेल्यांना, चिमणी-पाखरांना देऊन मगच स्वतः दोन घास खात. हे सर्व लक्षात घेऊन आपणही व्रतदिनी यथाशक्ती अन्नदान करावे. द्वारी आलेल्या याचकास विन्मुख पाठवू नये. भुकेलेल्यास अन्न द्यावे. कुत्र्याला भाकर-तुकडा घालावा. गाईला गोग्रास द्यावा. मुंग्यांना साखर घालावी. कबुतरांना वा पक्ष्यांना दाणे घालावेत. (यापैकी जे जमेल ते करावे.)





## श्री साईबाबांची पंचोपचार पूजा

**पूजेची पूर्व तयारी -**

१) पूजास्थान स्वच्छ करून घ्यावे.

२) जेथे पाट किंवा चौरंग मांडायचा आहे. त्याजागी रांगोळीने स्वस्तिक काढावे. मग पाट (चौरंग) मांडून त्याभोवती सुरेख रांगोळी काढावी.

३) पाटावर (चौरंगावर) कोरे पिवळे वस्त्र घालावे.

४) त्यावर श्रीसाईबाबांची तसबीर ठेवावी. तसबिरीतील साईबाबा बसलेले असावेत. ही तसबीर पडणार नाही याची दक्षता घ्यावी.

५) चौरंगावर आपल्या उजव्या बाजूस थोड्याशा कुंकुमाक्षता ठेवून त्यावर गणपती पूजनासाठी सुपारी ठेवावी. डाव्या बाजूस घंटा ठेवावी.

६) चौरंगावर श्रीसाईबाबांच्या तसबिरीसमोर उदबत्ती, निरांजन, पानसुपारी, प्रसादाचा नैवेद्य ठेवण्यास पुरेशी जागा असावी.

७) पूजेचे साहित्य तबकात आपल्या उजव्या हातास ठेवावे.

८) समई प्रदीप्त करून चौरंगाच्या शेजारी आपल्या डाव्या बाजूस ठेवावी.

९) स्वतःला बसण्यासाठी आसन मांडावे.

**पूजाप्रारंभ -**

सोवळे किंवा धूतवस्त्र नेसून, एक उत्तरीय वस्त्र खांद्यावर ठेवून, स्वतःला गंध लावून आणि घरातील देवांची नित्यपूजा करून पूजनाला बसावे. पूजनाला बसण्यापूर्वी सर्वप्रथम आपल्या इष्टदेवतांना हळद-कुंकू वाहून देवांपुढे विडा (विड्याची दोन पाने, त्यावर एक नाणे व एक सुपारी) ठेवावा व नमस्कार करावा. घरातील वडिलधाऱ्यांना नमस्कार करून आसनावर बसावे व पूजेस सुरुवात करावी. प्रथम गणपती आणि श्रीसाईबाबा यांना नमस्कार करून पूजेचा संकल्प करावा.

**पूजेचा संकल्प -** सर्वप्रथम पुढील प्रमाणे संकल्प करावा.

"मी (नाव) .....माझी .... इच्छा पूर्ण व्हावी म्हणून शास्त्रात सांगितल्याप्रमाणे पुराणोक्त विधीने श्रीसाईबाबांची, जी पूजाद्रव्ये प्रयत्नत: प्राप्त आहेत त्यांनी यथाशक्ती, पूर्ण श्रद्धेने व भक्तीने आज (तिथी व वार) आणि दिनांक ...... (इंग्रजी तारीख) रोजी जी पंचोपचार पूजा करीत आहे, ती निर्विघ्नपणे व्हावी अशी श्रीविघ्नहर्त्या गजाननाची व श्रीसाईबाबांची प्रार्थना करीत आहे. श्रीगणेशाय नम:। श्रीसाईनाथाय नम:। मम कार्यं निर्विघ्नमस्तु।" असे म्हणून एक फूल सुपारीरूप गणपतीवर वाहावे व नमस्कार करावा. त्यानंतर पुढीलप्रमाणे पंचोपचारांनी पूजा करावी.

**पंचोपचार पूजा -**

पंचोपचारे पूजन करताना सर्वप्रथम श्रीसाईबाबांचा "**त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:।**" हा मंत्र उच्चारून मगच उपचार अर्पण करावयाचा आहे. मंत्र पूर्णपणे म्हणावा.

१) **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। विलेपनार्थे चंदनं समर्पयामि।**
(श्रीसाईबाबांचे चरण व मस्तकास चंदन, अष्टगंध वा कुंकूम तिलक लावावा.)

२) **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। पूजार्थे पुष्पं समर्पयामि।**
(श्रीसाईबाबांच्या तसबिरीसमोर गुलाबाचे फूल वा अन्य सुवासिक फूल ठेवावे किंवा माळ घालावी.)

३) **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। सुवासार्थे परिमल द्रव्यं धूपं च समर्पयामि।**
(श्रीसाईबाबांच्या तसबिरीसमोर हिना अत्तरात भिजवलेला कापूस





ठेवावा. त्यानंतर उदबत्ती पेटवून किंवा धुपाटण्यात धूप पेटवून उजव्या हाताने साईबाबांना ओवाळून ती उदबत्ती वा धुपाटणे पाटावर ठेवावे. यावेळी डाव्या हातात घंटा घेऊन ती वाजवावी व पुन्हा पाटावर आपल्या डाव्या बाजूस ठेवावी.)

४) **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। दीपार्थे नीरांजनदीप समर्पयामि।**
(नीरांजनात तूप व फुलवात घातलेली असावी. ते प्रदीप्त करून व डाव्या हातात घंटा घेऊन घंटानाद करीत श्रीसाईबाबांना ओवाळावे. घंटा डाव्या बाजूस तर नीरांजन पाटावर/चौरंगावर उजव्या हातास ठेवावे.)

५) **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। नैवेद्यार्थे मिष्टान्नं नैवेद्यं समर्पयामि।**
(चौरंगावर श्रीसाईबाबांसमोर ताटात किंवा वाटीत नैवेद्य ठेवावा. त्या पात्राखाली पाण्याने मंडल करावे. हा नैवेद्य फळे, मिठाई, खडीसाखर असा काहीही चालेल. नैवेद्याभोवती डावीकडून उजवीकडे पाणी हातात घेऊन परिसिंचन करावे (फिरवावे) व नमस्कार करावा. (हा नैवेद्य पूजेनंतर सर्वांना प्रसाद म्हणून वाटावा.) त्यानंतर **त्रिगुणात्मक दत्तात्रेयस्वरूपिणे परमकारुणिकाय श्रीसाईनाथाय नम:। यथाशक्ति द्रव्यात्मकां दक्षिणां समर्पयामि।** असे म्हणून विड्याच्या दोन पानांवर १ रुपयाचे, २रुपयाचे वा ५ रुपयाचे नाणे ठेवून त्यावर एक पळीभर पाणी उजव्या हातावरून सोडावे. त्यानंतर श्रीसाईबाबांची पुढील प्रमाणे प्रार्थना करावी.

**प्रार्थना :**

"हे सद्गुरु साईनाथा! माझी इष्टकामना पूर्ण व्हावी म्हणून मी आपली पंचोपचारे पूजा करून पवित्र नैवेद्य अर्पण केला आहे. तरी या पूजेचा व नैवेद्याचा स्वीकार करून आपण मजवर प्रसन्न व्हावे व इष्ट कामनापूर्तीचा





आशीर्वाद द्यावा. अल्पमतीप्रमाणे हे पूजन केले आहे तरी न्यून असल्यास क्षमा करून पुरते करून घ्यावे ही प्रार्थना!" प्रार्थनेनंतर श्रीसाईबाबांची आरती करावी.

**पूजा विसर्जन -**

दुसऱ्या दिवशी आंघोळ केल्यानंतर श्रीसाईबाबांच्या तसबिरीला गंध, फूल व अक्षता वाहून नमस्कार करावा. सर्व वस्तू नीट उचलून स्वच्छ करून त्यांच्या जागी ठेवाव्यात. गणपती म्हणून पुजलेली सुपारी देव्हाऱ्यात ठेवावी व तीच सुपारी पुढील प्रत्येक गुरुवारी पूजेसाठी घ्यावी. व्रतोद्यापन झाल्यावर दक्षिणेसह ब्राह्मणास दान द्यावी. बाबांना दक्षिणा म्हणून ठेवलेली नाणी काळजीपूर्वक एके ठिकाणी ठेवावी. उद्यापनानंतर ती सर्व दक्षिणा साईबाबांच्या मंदिरात दानपेटीत टाकावी. पूजेचे निर्माल्य वेळच्यावेळी विसर्जित करावे.

**व्रतोद्यापन -**

१) या व्रताचे उद्यापन नऊ गुरुवारपर्यंत व्रताचरण करून झाल्यावर दहाव्या गुरुवारी करावे.

२) या दिवशी नेहमीप्रमाणे श्रीसाईबाबांची पंचोपचारे पूजा करावी.

३) या दिवशी नेहमीप्रमाणे स्वयंपाक करावा. त्यात एखादे गोड पक्वान्न असावे. श्रीसाईबाबांना महानैवेद्य दाखवावा. भोजनाच्या वेळी श्रीसाईबाबांना दाखवलेला महानैवेद्य व्रतकर्त्याने ग्रहण करावा.

४) उद्यापनास एका लहान किंवा किशोरवयीन मुलाला जेवावयास बोलवावे. त्यास भोजन, दक्षिणा व जमल्यास एखादे वस्त्र द्यावे. पाच गरीब माणसांनाही भोजन (अथवा शिधा), दक्षिणा व शक्य असल्यास एखादे वस्त्र द्यावे.

५) समाजात या व्रताचा व साईभक्तीचा प्रचार-प्रसार व्हावा म्हणून या व्रताची यथाशक्ती ५, ७, ११, २१ पुस्तके आपले मित्र, नातेवाईक, शेजारी व ओळखीच्या लोकांमध्ये वाटावी. दहाव्या गुरुवारी साईबाबांची पूजा करताना या पुस्तकांचीही हळद, कुंकू व पुष्प अर्पण करून पूजा करावी व नंतरच ती भेट द्यावीत.





६) सायंकाळी श्रीसाईबाबांच्या तसबिरीसमोर सुगंधी अगरबत्ती व तुपाचा दिवा लावून पुढील प्रार्थना म्हणावी-"हे सद्गुरु साईनाथा! हे शिरडीनिवासी भगवंता! आज तुमच्याच परम कृपेने माझ्याकडून तुमचे नऊ गुरुवारचे हे व्रत उद्यापनसहित यथासांग पूर्ण झाले आहे. ही सेवा आपण गोड मानून घ्या आणि माझे इष्ट मनोरथ पूर्ण करण्याची कृपा करा. या व्रताचरणात काही न्यून राहिले असल्यास वा अनवधनाने काही चूक झाली असल्यास उदार अंत:करणाने क्षमा करून माझ्यावर आपली कृपादृष्टी ठेवा." त्यानंतर श्रीसाईबाबांना अत्यंत आदराने नमस्कार करावा.

७) **विशेष सूचना-** नऊ गुरुवारचे व्रताचरण पूर्ण झाल्यावर दहाव्या गुरुवारी उद्यापन करण्यास काही अडचण येणारी असल्यास श्रीसाईबाबांना आपली अडचण सांगून उद्यापनाचा संकल्प करून ठेवावा. व जमेल तेव्हा लवकरात लवकर उद्यापन करावे.

## श्रीसाईनाथ माहात्म्य अर्थात नऊ गुरुवारची व्रतकथा

**प्रकटले शिरडीत श्रीसाईनाथ :** महाराष्ट्रातील तीर्थक्षेत्रांमध्ये 'शिरडी' हे नाव सर्वांना सुपरिचित आहे. संतश्रेष्ठ श्रीसाईबाबांच्या वास्तव्याने नावारुपास आलेले हे क्षेत्र अहमदनगर जिल्ह्यातील कोपरगाव तालुक्यात येते.

श्रीसाईबाबा सोळा वर्षांचे असताना शिरडीतील एका निंबवृक्षाखाली प्रथम प्रकट झाले. त्यांचे जन्मगाव, माता-पिता, कुळ, गोत्र व पूर्वायुष्य याबद्दल कोणालाही कसलीही माहिती नाही. ते अहोरात्र त्या निंबाखाली बसून असत. त्यावेळी त्यांच्या मुखावरचे तेज पाहून सर्वांना मोठे नवल वाटे. हा मुलगा आहे तरी कोण? हे जाणून घेण्याची गावकऱ्यांना मोठी उत्कंठा होती. एके दिवशी एका माणसाच्या अंगात खंडोबाचा संचार झाला असताना लोकांनी देवाला त्या मुलाविषयी विचारले.तेव्हा खंडोबाने त्यांना त्याच निंबाखाली नेले

व एका जागी खोदण्यास सांगितले. लोकांनी कुदळीने ती जागा उकरली तेव्हा काही विटा रचलेल्या आढळल्या. त्या बाजूस केल्यावर एक भुयार दिसले. त्यात एक तळघर होते आणि त्या ठिकाणी एक गोमुखी पाट, जपमाळ व चार प्रज्वलीत समया होत्या. ते पाहून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. तेव्हा खंडोबा म्हणाला,''या मुलाने येथे बारा वर्षे तपश्चर्या केली आहे.'' लोकांनी त्या मुलाला त्या स्थानाविषयी विचारले तेव्हा तो म्हणाला,''हे माझ्या गुरुचे स्थान आहे. ते अत्यंत पवित्र असून त्याचे काळजीपूर्वक जतन करा.'' तेव्हा लोकांनी विटा पूर्ववत रचून ते भुयार बंद केले. त्यानंतर काही दिवसांनी तो मुलगा अचानक निघून गेला. भक्तजनहो! हाच मुलगा पुढे 'श्रीसाईबाबा' या नावाने प्रख्यात झाला.

**चांद पाटलाची घोडी सापडली :** औरंगाबाद जिल्हातील धूप नावाच्या खेडेगावात चांद पाटील नावाचा एक मुसलमान गृहस्थ राहत असे. त्याची घोडी हरवली होती. ती दोन महिने शोधूनही सापडली नाही तेव्हा तो अगदी हताश झाला. एके दिवशी औरंगाबादहून गावी परतत असताना त्याला एका झाडाखाली एक फकीर बसलेला दिसला. त्याने चांद पाटलास बोलावले आणि चिलीम ओढून मगच पुढे जाण्यास सांगितले. त्यावेळी परस्परांशी गप्पा मारताना चांद पाटलाने त्या फकीरास आपली घोडी हरवली असल्याचे सांगितले. तेव्हा त्या फकीराने एका जागेकडे बोट दाखवून तेथे त्याची घोडी असल्याचे सांगितले. पाटलाचा त्या फकीरावर विश्वास नव्हता पण तरीही तो तेथे गेला, तर काय आश्चर्य ! त्याला तेथे त्याची घोडी चरताना दिसली. तेव्हा त्याला तो फकीर कोणी सामान्य मनुष्य नसून मोठा अवलिया आहे याची खूण पटली. तो आनंदाने त्या फकीरापाशी आला. त्यानंतर त्या फकीराने चिलीम भरली. पण निखारा कोठून आणणार? तेव्हा पंचमहाभूतांवर सत्ता असलेल्या त्या फकीराने आपला चिमटा मातीत खुपसून एक निखारा बाहेर काढला. तो





अलगद चिलीमीवर ठेवला. मग आपला सटका जमिनीवर आपटून तेथे पाणी उत्पन्न केले. त्यात छापी (एक लहानसा फडका) भिजवली आणि चिलमेभोवती गुंडाळून निवांत झुरके घेऊ लागला. चांदही त्यात सामिल झाला. हा फकीर म्हणजेच साईबाबा ! चांद पाटलाने त्यांना विनंती करून आपल्या घरी नेले.

**पुनश्च शिरडी.........! :** अशाप्रकारे त्या फकीराने चांद पाटलाकडे मुक्काम केला.पुढे पाटलांच्या घरचेच लग्न निघाले. वधू शिरडीची होती म्हणून पाटलांच्या वऱ्हाडासमवेत तो फकीरही शिरडीस आला. तेथे खंडोबाच्या देवळासमोरच म्हाळसापतींच्या खळ्यात गाड्या सुटल्या. त्यापैकी एका गाडीतून तो फकीर खाली उतरला. त्यावेळी त्याची तेजस्वी मूर्ती आणि प्रसन्न मुद्रा पाहून म्हाळसापतींना राहवले नाही. ते त्वरेने त्या फकीरापाशी गेले आणि ''आवो साई !'' असे म्हणून त्यांचे प्रेमाने स्वागत केले. तेव्हापासून सर्व लोक त्यांस 'साई' अशी हाक मारू लागले. त्यावरूनच पुढे 'साईबाबा' हे नाव रूढ झाले. लग्नकार्य झाल्यावर चांद पाटलांनी विनंती करूनही बाबा त्यांच्याबरोबर गेले नाहीत. त्यांनी शिरडीतच एका पडक्या मशिदीत मुक्काम केला.

**द्वारकामाई :** पुढे ही मशिदच त्यांचे कार्यक्षेत्र झाली. असंख्य भाविक येथेच त्यांच्या दर्शनास येऊ लागले. बाबा या मशिदीचा मोठ्या आदराने 'द्वारकामाई' असा उल्लेख करीत असत. तेथे एक धुनी सतत पेटलेली असे. बाबा स्वत: एका पोत्यावर झोपत असत. त्यांचे टमरेल, सटका, चिलीम, डोक्याला घ्यायची वीट आदी वस्तू तेथेच ठेवलेल्या असत. त्यांना भजन आवडायचे. मनात आले तर पायात घुंगरू बांधून नाचून, हावभाव करून ते भावपूर्ण गायचे.

**असा झाला दीपोत्सव :** बाबांना दीपोत्सव करायला भारी आवडायचे. ते मशिदीत असंख्य पणत्या लावून सर्व परिसर 'उजळून टाकीत. त्यासाठी लागणारे तेल ते वाण्यांकडून मागून आणत. एकदा सर्व वाण्यांनी कपट केले.





एकानेही तेल दिले नाही. पण बाबांना त्याचे काय? त्यांनी पणत्यांमध्ये पाणी घालून लक्षदीप उजळले. ते सामर्थ्य पाहून सर्व वाणी त्यांना शरण आले.

**श्रीसाईबाबांची वैद्यकी :** बाबांना समाजसेवेची अत्यंत आवड होती. ते रुग्ण पाहून औषधोपचार करीत. हे उपचारही जगावेगळे असत.पण बाबांवर श्रद्धा ठेवून लोक उपचार करवून घेत. एकदा एका भक्ताचे डोळे सुजले होते; दोन्ही बुबुळे लालबुंद झाली होती. त्यात बाबांनी बिब्बे ठेचून भरले आणि नवल म्हणजे त्या भक्ताला त्या उपचाराने पूर्ण बरे वाटले.

**नाही भेदभाव त्याठायी :** श्रीसाईबाबांपाशी अनेक जातीधर्मांचे आर्त व दु:खी लोक यायचे. त्यांना आपल्या व्यथा, चिंता सांगायचे. बाबा त्या सर्वांच्या चिंता जाणून त्यांचे योग्य निरसन करायचे. ते सर्वांशी एकपणाने वागत, आपुलकीने त्यांना जवळ घेत. त्यांच्यापाशी कसलाही भेदभाव नव्हता. कोणी बाबांपाशी गेले आणि तेथून विन्मुख परतले असे कधीही घडले नाही, पुढे घडणारही नाही. एकदा दादासाहेब खापर्डे त्यांना भेटावयास गेले असताना त्यांच्या मुलाला प्लेगाने गाठले. तेव्हा बाबांनी त्याचे दुखणे स्वत: भोगून त्याला जीवदान दिले.

**जाणती सकलांचे मनोगत :** साईबाबा कपाळास कधीही गंध लावून घेत नसत. एकदा दर्शनास आलेल्या डॉ. पंडितांनी त्यांची पूजा करून कपाळास गंध लावले. तेव्हा दादा भटांना बाबा रागावतील असे वाटले. पण तसे काहीही घडले नाही. सायंकाळी दादा भटांनी बाबांना त्याचे कारण विचारले. तेव्हा बाबा म्हणाले,''अरे, त्याचा गुरु ब्राह्मण आहे आणि मी तर मुसलमान. पण तरीही मी त्याचा गुरूच आहे असे समजून त्याने माझी पूजा केली. भक्तीपुढे या फकीराचे काहीही चालत नाही.

एकदा तर्खडकरांच्या पत्नीने कुत्र्याला प्रेमाने भाकरी खाऊ घातली. ती सायंकाळी दर्शनास गेली असताना बाबा तिला म्हणाले,''माय, मी तृप्त





झालो!''

ते बोलणे तिला समजले नाही. तिने विचारले,''बाबा, असे तुम्ही का म्हणता?'' तेव्हा बाबांनी उत्तर दिले,''तू दुपारी ज्याला भाकरी घातलीस तो कुत्रा मीच होतो. जो सर्वांमध्ये मला पाहतो, भुकेल्याची भूक जाणतो, तो मला अतिशय प्रिय असतो.''

वेदशास्त्रपारंगत मुळे शास्त्री एकदा गोपाळ बुट्टींसमवेत साईंच्या दर्शनास गेले होते. ते सोवळे-ओवळे पाळत असल्याने त्यांनी बाबांचे दुरूनच दर्शन घेतले. तेव्हा बाबांनी त्यांना त्यांच्या पूर्वीच समाधिस्थ झालेल्या घोलप गुरुजींच्या स्वरुपात दर्शन दिले. तेव्हा त्यांनी त्वरेने धाव घेऊन बाबांचे चरण धरले. अशा प्रकारे बाबांनी त्यांच्या मनातील शंका घालवून त्यांना आपले भक्त केले. असेच एक डॉक्टर रामाशिवाय कोणालाच मानीत नसत. त्यांनाही बाबांनी श्रीरामस्वरुपात दर्शन देऊन प्रभु रामचंद्र आणि मी एकरूपच आहोत असे दाखवून दिले.

ठाण्याच्या चोळकरांनी बाबांना 'मला नोकरी मिळाल्यास मी तुम्हाला खडीसाखर अर्पण करीन.' असा नवस केला होता. त्यानंतर साईबाबांच्या कृपेने त्यांना नोकरी लागली. पण काही कारणाने नवस फेडण्यास विलंब झाला म्हणून त्यांनी साखर खाणेच सोडून दिले. चहाही कोराच पिऊ लागले. पुढे काही दिवसांनी ते बाबांच्या दर्शनास गेले व आपला नवस फेडला. तेव्हा बाबा तेथे असलेल्या जोगांना म्हणाले,''जोग, तुम्ही यांना भरपूर साखरेचा चहा पाजा.'' तेव्हा चोळकरांना श्रीबाबा अंतर्ज्ञानी असल्याची ओळख पटली.

**बाबांच्या उदीचा प्रभाव :** नानासाहेब चांदोरकरांनी मुलगी प्रसूतीसमयी अडली होती. तेव्हा बाबांनी गंगागीर गोसाव्यामार्फत उदी (अंगारा) पाठवून तिची सुखरुप सुटका केली. मुंबईतील एक गुजराथी गृहस्थ खिमजी लालजी यांची मुलगी दुर्धर व्याधीने गांजली होती. तिलाही बाबांच्या उदीने बरे वाटले. एका डॉक्टरच्या पुतण्याला हाडव्याव्रण झाला होता. देशी-विदेशी उपचार करूनही काहीच उपयोग

झाला नाही. ती व्याधीही श्रीबाबांच्या उदीरुपी प्रसादाच्या प्रभावाने बरी झाली.

श्रीसाईबाबांच्या अशा अनंत लीला आहेत. त्या किती म्हणून सांगाव्यात? ते कृपासिद्ध होते. कारुण्यमूर्ती होते. त्यांचा अवतारच लोकोपकारासाठी होता. श्रीक्षेत्र शिरडीत अनेक वर्षे वास्तव्य करून त्यांनी शके १८४० मध्ये विजया दशमीच्या दिवशी समाधी घेतली. आजही त्यांची चिरंतन ज्योती भावार्थी भक्तांना त्यांच्या कृपेची अनुभूती देतच आहे.

श्रीसाईबाबांची ही परमपवित्र कथा जे आवडीने वाचतील, श्रद्धेने श्रवण करतील त्यांची सर्व दुःख-संकटे नाहीशी होतील, त्यांच्या सर्व मनोकामना पूर्ण होऊन इहपरत्र कल्याण होईल.

**॥ इति श्रीसाईनाथ माहात्म्य अर्थात नऊ गुरुवार व्रतकथा संपूर्ण ॥**

****

## ॥ श्रीसाई चालीसा ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

जय जयाजी साई अवधूत। कृपावंत विश्वनाथ।
तया चरणीं होउनी नत। गातो यशोगान हे ॥१॥
श्रीसाईंची अलौकिक लीला। अनुभवपूर्वक निववी जनाला।
अभक्तही लागती सन्मार्गाला। असे प्रचिती यापरी॥२॥
घेता आदरे साईंचे दर्शन। तृप्त होती अवघे जन।
नामस्मरणे भक्त पावन। ब्रह्मानंद भोगती॥३॥
कोटी तीर्थें साई-चरणात। तया वंदिता क्षणार्धात।
महत्पापे असंख्यात। दग्ध होती निश्चये॥४॥
करिता आदरे श्रीसाई-अर्चन। तुटोनी जाते भवबंधन।
भाविक भोगती सौख्य महान। सायुज्यता पावती॥५॥
आजानुबाहू तेजस कांती। अति मनोहर दिव्य मूर्ती।
फकीर वेषें शोभला यती। पाहूनी कृतार्थ नरनारी॥६॥





ऋद्धि-सिद्धि द्वारी तिष्ठती। निर्जर मुनिजन दर्शना धावती।
थोर माहात्म्य दिगंती कीर्ती। चरित्र अति पावन ते॥७॥
श्रीसाईंची कृपादृष्टी। वळता जन्मव्यथा निरसती।
दुःख संकटे भिऊनी पळती। दाही दिशीं तत्काळ॥८॥
श्रीसाईंचे कीर्तन करीती। ते आपैसे तरूनी जाती।
नुरे चिंता क्लेश भीती। पावती समाधान ते॥९॥
साई मंगलाचे कारण। करीती सकल विघ्न-निवारण।
इष्टार्थसिद्धी प्रयोजन। साह्यकारी सज्जना॥१०॥
साई अमराधीश ईश्वर। परमपुरुष महदाकार।
संगरहित परात्पर। नित्यशुद्ध परमात्मा॥११॥
साईच आमचे सद्‌गुरु। साईच भवनदीचे तारू।
साईच नेतील पैलपारू। उतारू आम्ही बालके॥१२॥
साईच आमचे कुलदैवत। साईच इष्टदेव साक्षात।
साईच नारायण आदिनाथ। ब्रह्मा-विष्णु-महेश्वर॥१३॥
सर्वांतर्यामी साईंचा वास। साईच चैतन्य निर्विशेष।
परब्रह्म स्वयंप्रकाश। व्याप्त अंतर्बाह्य जे॥१४॥
साई सर्वज्ञ परिपूर्ण। चराचराचे विश्रांतीस्थान।
अवघ्या विश्वाचे अधिष्ठान। जाणती ज्ञानवंत ते॥१५॥
साई अचिंत्य चक्रपाणि। भक्तवत्सल भक्ताभिमानी।
वास करूनी शिरडीस्थानी। निजकार्याते चालविती॥१६॥
जधी धर्मलोप झाला। जन विसरले ऐक्यभावाला।
तधी साईंनी अवतार घेतला। ताराया जडमूढांते॥१७॥
षोडश वर्षीय कुमार मूर्ती। प्रथम प्रकटली शिरडीत ती।
तपश्चर्यारत निंबतळवटी। नवल वाटे सकलांसी॥१८॥





तें जनांते निजगुरुस्थान। दावुनी केले सहजी गमन।
काही काळ करूनी भ्रमण। पुन्हा प्रकटले योगिवर॥१९॥
चांद पाटलाची घोडी हरवली। ती साईकृपें सापडली।
माऊली पुनरपि शिरडीत आली। लग्न-वऱ्हाडा समवेत॥२०॥
प्रथम दर्शनी त्या फकीराला। पाहुनी म्हाळसापती तोषला।
'आओ साई' प्रेमे बोलला। केले स्वागत आदरे॥२१॥
तेच नाव रूढ जाहले। जन 'साईबाबा' म्हणू लागले।
सहज सुलभ ते नाम भले। घेता आनंद चित्तासी॥२२॥
मशिदीमाजी करूनी वास। लीला दावी जगन्निवास।
उद्धरावया भक्तजनांस। सिद्धपीठ ' द्वारकामाई' हो॥२३॥
अघटीत करणी अघटीत लीला। जल घालूनी दीपोत्सव केला।
अल्पावधीत चौफेर पसरला। कीर्ती-सुगंध श्रीसाईंचा॥२४॥
त्यांना हिंदू म्हणावे तरी। वेषभूषा यवनापरी।
'अल्ला मलिक' बोले वैखरी। आणि राहती मशिदीत॥२५॥
त्यांना म्हणावे मुसलमान। तरी मशिदीत अग्निपूजन।
शंख घंटा वाजवून। भजन पूजनही करीती ते॥२६॥
साई रामजन्मोत्सव करीत। गोपालकाल्यातही भाग घेत।
ईद दिनी मशिदमाईत। पढू द्यायचे नमाजही॥२७॥
सर्वांशी एकपणाने वागत। भेदाभेदच नव्हता तेथ।
कर्म सकलांचे बरेवाईट। मनोगतही जाणती ते॥२८॥
कोणी साईपाशी गेले। आणि तेथून विन्मुख परतले।
ऐसे अद्यापि नच घडले। काय वर्णावे महिमान॥२९॥
तयांपाशी अनेक प्रकारचे। दुःखी आर्त जन यायचे।
साई व्यथा जाणूनी तयांचे। करीत योग्य निवारण॥३०॥





सहज बोलणे सहज उपदेश। ऐसे वर्तन होते खास।
काया मानवी तरी प्रत्यक्ष। परमेश्वर ते जाणावे॥३१॥
श्रीसाईंच्या लीला अनंत। अगाध आणि अति अद्‌भुत।
श्रवण पठणे मोद अत्यंत। अवघा गोड विस्तार॥३२॥
कृपासिद्ध ते महासंत। अवतार लोकोपकारार्थ।
कित्येक वर्षे अविरत। भक्तकार्य चालविले॥३३॥
कित्येकांसी उपदेशिले। कित्येकांसी संकटी रक्षिले।
कित्येकांसी अभय दिधले। केले सुखी भक्तजनां॥३४॥
दुःखितांचे अश्रु पुसले। व्याधिग्रस्तां बरें केले।
अनेकांसी सन्मार्गी लावले। उद्धरिले कित्येकां॥३५॥
केवळ उपकारास्तव जन्म। केले अव्याहत जनकल्याण।
साई सर्वांची 'आई' होऊन। राहिले शिरडी ग्रामात॥३६॥
श्रीसाईंचे वास्तव्य म्हणून। क्षेत्र जाहले परमपावन।
एक सिद्धपीठ म्हणून। प्रसिद्ध भारत वर्षात॥३७॥
ऐसे सद्‌गुरु साईनाथ। शके अठराशे चाळीसात।
साधुनी दसऱ्याचा सुमुहूर्त। समाधिस्थ जाहले॥३८॥
मंत्र साई समर्थाचा। श्रद्धा आणि सबुरीचा।
तो अवलंबिता जीवनाचा। मार्ग सुखकर होईल॥३९॥
परी निष्ठा असावी साईचरणीं। समर्पणाची भावना मनी।
तेणे साई प्रसन्न होऊनी। सांभाळतील आपणा॥४०॥

### फलश्रुती

'श्रीसाईचालीसा' परमपावन। शुद्धभावे करिता पठण।
तेणे प्राप्त आशीर्वचन। सकल इष्ट पावाल॥
या ओव्यांची धरूनी संगत। करावे नामस्मरण यथार्थ।

'साईराम' 'जय साई समर्थ'। तेणे अभ्युदय होईल॥
याहूनी काय सांगू आता। गोडी चाखावी अनुभव घेता।
तरीच समजून ये श्रेष्ठता। मर्यादा अन्य साधनांसी॥
श्रीसाईंची कृपा म्हणून। हे लेखन झाले संपन्न।
'जितेन्द्रनाथ' हात जोडून। शरणागत श्रीचरणांसी॥
शके एकोणीसशे सव्वीस। आषाढमासी विनायकीस।
सायंकाळी तृतीय प्रहरास। झाले संपूर्ण स्तोत्र हे॥

॥ इति जितेन्द्रनाथ रचित श्रीसाईचालीसा संपूर्ण ॥

## ॥ श्रीसाई नमनाष्टक ॥

जय जयाजी सर्व समर्था। शिरडीवासी पुण्यवंता।
अखिल चराचरीं तुझीच सत्ता। साईनाथा नमो नमः॥१॥
पूर्णकाम तू कृपामूर्ती। भक्तवत्सल दिगंती कीर्ती।
भेदरहिता उदंड महती। साईनाथा नमो नमः॥२॥
तू निर्गुण निराकार। तव लीलेसी अंत ना पार।
अगाध चरित्र वेष फकीर। साईनाथा नमो नमः॥३॥
परब्रह्म तू परमेश्वर। भक्तसोयरा खरोखर।
ब्रह्मा-विष्णु-शिवहरशंकर। साईनाथा नमो नमः॥४॥
ऋद्धि-सिद्धि तुजसी वंदिती। भावे सुरवर मुनिजन ध्याती।
तेजोमय अलक्ष्य ज्योती। साईनाथा नमो नमः॥५॥
अनंतकोटी ब्रह्मांडनायक। सुखकारक तू भवभयहारक।
दु:खनिवारक जगदुद्धारक। साईनाथा नमो: नमः॥६॥
जे जे भावे तुजला भजती। त्या सकलांचे मनोरथ पुरती।
तव भजने शरणागत तरती। साईनाथा नमो नमः॥७॥





तू सकलांचे आश्रयस्थान। म्हणूनी आदरे धरितो चरण।
द्यावे मंगल आशीर्वचन। साईनाथा नमो नमः॥८॥

॥ इति जितेन्द्रनाथ रचित श्रीसाई-नमनाष्टक संपूर्ण ॥

## श्री साईबाबा - अष्टोत्तरशत नामावली

ॐ श्री साईनाथाय नमः।
ॐ लक्ष्मीनारायणाय नमः।
ॐ कृष्णरामशिवमारुत्यादिरूपाय नमः।
ॐ शेषशायिने नमः।
ॐ गोदावरीतट शीलधीवासिने नमः।
ॐ भक्तहृदालयाय नमः।
ॐ सर्वहृन्निलयाय नमः।
ॐ भूतवासाय नमः।
ॐ भूतभविष्यद्भाववर्जिताय नमः।
ॐ कालातीताय नमः।
ॐ आरोग्यक्षेमदाय नमः।
ॐ धनमानप्रदाय नमः।
ॐ ऋद्धिसिद्धिदाय नमः।
ॐ पुत्रमित्रकलत्रबंधुदाय नमः।
ॐ योगक्षेमवहाय नमः।
ॐ आपद्बांधवाय नमः।
ॐ मार्गबंधवे नमः।
ॐ भुक्तिमुक्तिस्वर्गापवर्गदाय नमः।
ॐ प्रियाय नमः।
ॐ प्रीतिवर्धनाय नमः।
ॐ अन्तर्यामिणे नमः।
ॐ सच्चिदात्मने नमः।
ॐ शरणागतवत्सलाय नमः।
ॐ भक्तिशक्तिप्रदाय नमः।
ॐ ज्ञानवैराग्यदाय नमः।
ॐ प्रेमप्रदाय नमः।
ॐ संशयहृदयदौर्बल्यपापकर्म-वासनाक्षयकराय नमः।
ॐ हृदयग्रन्थिभेदकाय नमः।
ॐ कर्मध्वंसिने नमः।
ॐ शुद्धसत्त्वस्थिताय नमः।
ॐ गुणातीतगुणात्मने नमः।
ॐ अनन्तकल्याणगुणाय नमः।
ॐ अमितपराक्रमाय नमः।
ॐ कालाय नमः।
ॐ कालकालाय नमः।
ॐ कालदर्पदमनाय नमः।
ॐ मृत्युंजयाय नमः।
ॐ अमर्त्याय नमः।





ॐ मर्त्याभयप्रदाय नमः।
ॐ जीवाधाराय नमः।
ॐ सर्वधाराय नमः।
ॐ भक्तावनसमर्थाय नमः।
ॐ भक्तावनप्रतिज्ञाय नमः।
ॐ अन्नवस्त्रदाय नमः।
ॐ नित्यानंदाय नमः।
ॐ परमसुखदाय नमः।
ॐ परमेश्वराय नमः।
ॐ परब्रह्मणे नमः।
ॐ परमात्मने नमः।
ॐ ज्ञानस्वरूपिणे नमः।
ॐ जगत: पित्रे नमः।
ॐ भक्तानां मातृधातृपितामहाय नमः।
ॐ भक्ताभयप्रदाय नमः।
ॐ भक्तपराधीनाय नमः।
ॐ भक्तानुग्रहकातराय नमः।
ॐ जयिने नमः।
ॐ दुर्धर्षाक्षोभ्याय नमः।
ॐ पराजिताय नमः।
ॐ त्रिलोकेषु अविघातगतये नमः।
ॐ अशक्यरहिताय नमः।
ॐ सर्वशक्तिमूर्तये नमः।
ॐ सुरूपसुंदराय नमः।
ॐ सुलोचनाय नमः।
ॐ बहुरुपविश्वमूर्तये नमः।
ॐ अरुपाव्यक्ताय नमः।
ॐ अचिन्त्याय नमः।
ॐ सूक्ष्माय नमः।
ॐ सर्वान्तर्यामिने नमः।
ॐ मनोवागतीताय नमः।
ॐ प्रेममूर्तये नमः।
ॐ सुलभदुर्लभाय नमः।
ॐ असहायसहायाय नमः।
ॐ अनाथनाथ-दीनबंधवे नमः।
ॐ सर्वभारतभूतये नमः।
ॐ अकर्मणे कुकर्मसुकर्मिणे नमः।
ॐ पुण्यश्रवणकीर्तनाय नमः।
ॐ तीर्थाय नमः।
ॐ वासुदेवाय नमः।
ॐ सतां गतये नमः।
ॐ सत्पुरुषाय नमः।
ॐ पुरुषोत्तमाय नमः।
ॐ सत्यतत्त्वबोधकाय नमः।
ॐ कामादिषड्वैरिध्वंसिने नमः।
ॐ समसर्वमतसंमताय नमः।
ॐ दक्षिणामूर्तये नमः।
ॐ श्री व्यंकटेशरमणाय नमः।





ॐ अद्भुतानंदाचर्याय नमः।
ॐ प्रपन्नार्तिहराय नमः।
ॐ सत्परायणाय नमः।
ॐ लोकनाथाय नमः।
ॐ पावनानघाय नमः।
ॐ अमृतांशवे नमः।
ॐ भास्करप्रभाय नमः।
ॐ ब्रह्मचर्यतपश्चर्यादिसूत्राय नमः।
ॐ सत्यधर्मपरायणाय नमः।
ॐ सिद्धेश्वराय नमः।
ॐ सिद्धसंकल्पाय नमः।
ॐ योगेश्वराय नमः।
ॐ भगवते नमः।
ॐ भक्तवत्सलाय नमः।
ॐ संसारसर्वदु:खक्षयकराय नमः।
ॐ सर्ववित्सर्वतोमुखाय नमः।
ॐ सर्वान्तर्बहि:स्थिताय नमः।
ॐ सर्वमंगलकराय नमः।
ॐ सर्वाभीष्टप्रदाय नमः।
ॐ समरससन्मार्गस्थापनाय नमः।
ॐ समर्थसद्गुरु साईनाथाय नमः।
ॐ सकलइष्टप्रदाय नमः।

*****

- दासगणू विरचित -

## ॥ प्रार्थनाष्टक ॥

शांतचित्ता महाप्रज्ञा। साईनाथा दयाघना॥
दयासिंधो सत्स्वरूपा। मायातमविनाशना॥१॥
जातगोतातीता सिद्धा।अचिंत्या करुणालया॥
पाहि मां पाहि मां नाथा। शिर्डीग्रामनिवासिया॥२॥
श्रीज्ञानार्का ज्ञानदात्या। सर्व मंगलकारका॥
भक्तचित्तमराळा हे। शरणागतरक्षका ॥३॥
सृष्टिकर्ता विरंची तूं। पाता तूं इंदिरापती॥
जगत्रय लया नेता। रुद्र तो तूंच निश्चितीं॥४॥
तुज वीणें रिता कोठें। ठाव ना या महीवरी॥
सर्वज्ञ तूं साईनाथा। सर्वांच्या हृदयांतरीं॥५॥

क्षमा सर्वापराधांची। करावी हेंचि मागणे॥
अभक्ति संशयांच्या त्या। लाटा शीघ्र निवारणे॥६॥
तूं धेनू वत्स मी तान्हे। तूं इंदु चंद्रकांत मी॥
स्वर्नदीरूप त्वत्पादा। आदरें दास हा नमी॥७॥
ठेव आतां शिरीं माझ्या। कृपेचा करपंजर॥
शोक चिंता निवारावी। गणू हा तव किंकर॥८॥

***

## दासगणू महाराजांची साईभक्तिपर पदे

### पद-१ (मराठी)

शिरडी माझे पंढरपुर। साईबाबा रमावर॥१॥
शुद्ध भक्ती चंद्रभागा। भाव पुंडलिक जागा॥२॥
या हो या हो अवघे जन। करा बाबांसी वंदन॥३॥
गणू म्हणे बाबा साई। धाव पाव माझे आई॥४॥

### पद-२ (हिन्दी)

साई रहम नजर करना। बच्चों का पालन करना॥धृ.॥
जाना तुमने जगत्पसारा। सबही झूठा जमाना॥साई०॥१॥
मैं अंधा हूँ बंदा आपका। मुझको प्रभु दिखलाना॥साई०॥२॥
दास गणु कहे अब क्या बोलूं। थक गई मेरी रसना॥साई०॥३॥

### पद-३ (हिन्दी)

रहम नजर करो अब मोरे साई। तुम बिन नही मुझे माँ-बाप-भाई।
मैं अंधा हूँ बंदा तुम्हारा। मैं ना जानूं अल्ला इलाही॥रहम०॥१॥
खाली जमाना मैं ने गंवाया। साथी आखर का किया न कोई॥रहम०॥२॥
अपने मशिदका झाडू गणु है। मलिक हमारे तुम बाबा साई॥रहम०॥३॥





## साई धून

हरे राम हरे राम राम राम हरे हरे।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे॥
हरे साई हरे साई साई साई हरे हरे।
हरे बाबा हरे बाबा बाबा बाबा हरे हरे॥
हरे दत्त हरे दत्त दत्त दत्त हरे हरे।
हरे साई हरे साई साई साई हरे हरे॥
साई राम साई राम साई राम साई राम।
साई श्याम साई श्याम साई श्याम साई श्याम॥

***

॥ ॐ श्री साईनाथ प्रसन्न ॥

## श्री साईबाबांची आरती

आरती साईबाबा। सौख्यदातारा जीवा। चरणरजातळीं। द्यावा दासां विसावा, भक्तां विसावा॥धृ०॥ जाळुनिया अनंग। स्वस्वरूपी राहे दंग। मुमुक्षु जनां दावी। निज डोळा श्रीरंग, डोळा श्रीरंग॥ आरती०॥१॥ जया मनीं जैसा भाव। तया तैसा अनुभव। दाविसी दयाघना। ऐसी तुझी ही माव, तुझी ही माव॥ आरती०॥२॥ तुमचे नाम ध्याता। हरे संसृतिव्यथा। अगाध तव करणी। मार्ग दाविसी अनाथा, दाविसी अनाथा॥ आरती०॥३॥ कलियुगीं अवतार। सगुणब्रह्म साचार। अवतीर्ण झालासे। स्वामी दत्त दिगंबर, दत्त दिगंबर॥ आरती०॥४॥ आठां दिवसां गुरुवारी। भक्त करिती वारी। प्रभुपद पहावया। भवभय निवारी, भय निवारी॥ आरती०॥५॥ माझा निज द्रव्य ठेवा। तव चरणरजसेवा। मागणें हेंची आतां। तुम्हां देवाधिदेवा, देवाधिदेवा॥ आरती०॥६॥ इच्छित दीन चातक। निर्मल तोय निजसुख। पाजावें माधवा या। सांभाळ आपुली भाक, आपुली भाक॥ आरती०॥७॥








## श्री साईबाबांची भक्तांना अभय देणारी अकरा वचने

शिरडीस ज्याचे लागतील पाय। टळती अपाय सर्व त्याचे॥१॥
माझ्या समाधीची पायरी चढेल। दुःख हे हरेल सर्व त्याचे॥२॥
जरी हे शरीर गेलो मी टाकून। तरी मी धांवेन भक्तांसाठी॥३॥
नवसास माझी पावेल समाधी। धरा दृढ बुद्धी माझ्या ठायी॥४॥
नित्य मी जिवंत जाणा हेंचि सत्य। नित्य घ्या प्रचीत अनुभवे॥५॥
शरण मज आला आणि वाया गेला। दाखवा दाखवा असा कोणी॥६॥
जो जो मज भजे जैशा जैशा भावे। तैसा तैसा पावे मीही त्यासी॥७॥
तुमचा मी भार वाहीन सर्वथा। नव्हे हे अन्यथा वचन माझे॥८॥
जाणा येथे आहे सहाय्य सर्वांस। मागे जे जे त्यास ते ते लाभे॥९॥
माझा जो जाहला काया वाचा मनीं। तयांचा मी ऋणी सर्वकाळ॥१०॥
साई म्हणे तोचि तोचि झाला धन्य। झाला जो अनन्य माझे पायी॥११॥

प्रकाशक : त्रिवेणी प्रकाशन, माधवबाग, सी.पी. टँक रोड, मुंबई ४०० ००४.
विक्रेता : गर्ग आणि कं. बुकसेलर्स, १०६ सी.पी. टँक रोड, मुंबई ४०० ००४.
मुद्रक : शालिनी प्रिंटर्स, मुंबई. अक्षरजुळणी : साफल्य, मुंबई.